शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, लातूर येथील पदव्युत्तर व आंतरवासिता वसतिगृह (जी + ४) बांधकाम करणेबाबत.

---

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : जीसीएल-२०१८/प्र.क्र.३५७/प्रशा-१
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल इमारत,
९ वा मजला, नविन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०००01.
दिनांक : २६ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा :**
१. शासन निर्णय वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्रमांक पीएमसी - २०१८ /१११५ / प्र.क्र. ४२३ (अ)/ प्रशा -१, दिनांक ०८.०२.२०१८
२. शासन निर्णय वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्रमांक पीएमसी - २०१८ /१११५ / प्र.क्र. ४२३ / प्रशा -१, दिनांक २४.१२.२०१८
३. शासन निर्णय समक्रमांक दिनांक २९.०६.२०१९.
४. शासन निर्णय समक्रमांक १३.०८.२०१९

**प्रस्तावना :**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, लातूर या संस्थेच्या येथील पदव्युत्तर व आंतरवासिता वसतिगृह (जी + ४) बांधकाम करण्यासाठी उपरोक्त दिनांक २९.०६.२०१९ च्या शासन निर्णयान्वये एकूण रुपये ४६,५५,४८,०००/- ( रुपये सेहेचाळीस कोटी पंचावन्न लक्ष अठ्ठेचाळीस हजार फक्त ) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास उपरोक्त समक्रमांकाच्या दिनांक २९.०६.२०१९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. सदर बांधकाम उपरोक्त दिनांक २४.१२.२०१८ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार केंद्र शासनाच्या सार्वजनिक उपक्रम कंपनीमार्फत करण्याबाबत निर्णय घेण्यात आला होता. सदर बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करून घेणेबाबतचा प्रस्ताव विचारधीन होता.

**शासन निर्णय** :

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, लातूर या संस्थेच्या येथील पदव्युत्तर व आंतरवासिता वसतिगृह (जी + ४) हे बांधकाम केंद्र शासनाच्या सार्वजनिक उपक्रम कंपनीमार्फत करून घेणे संदर्भातील कार्यवाही आहे त्या टप्प्यावर रद्द करण्यात येत आहे. सदर बांधकाम सार्वजनिक बांधकाम

विभागामार्फत करण्यात यावे. सदर बांधकामासाठी खालील लेखाशिर्षातून निधी उपलब्ध करून दिला जाईल.

मागणी क्रमांक - एच-८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन,
१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२२६१३१०५११८४१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN MURLIDHARRAO DAHALE

Digitally signed by ARUN MURLIDHARRAO DAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, postalCode=400032, street=MANTRALAYA ,MUMBAI, serialNumber=30df743755280cf26ce97ec0978235f63f80f0bc4317129bf381eb48778f2e3d, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARUN MURLIDHARRAO DAHALE
Date: 2020.02.26 13:57:30 +05'30'

(अ.मु.डहाळे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), नागपूर, महाराष्ट्र.
२. अपर मुख्य सचिव (वित्त) , वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव तथा विधी परामर्शी, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद.
७. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
८. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, लातूर
९. कक्ष अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, (इमारत-३) मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग, लातूर.
११. व्यवस्थापकीय संचालक, एचएससीसी( इंडिया ) लिमीटेड , नवी दिल्ली
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर
१३. निवडनस्ती (प्रशा-१)